**कृषि व्यावसायिकेतर आधारीत उपक्रमांच्या अंमलबजावणीसाठी**
**निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांस मान्यता देणेबाबत...**

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक : जसुप्र ५४११/प्र.क्र.६/३ अे
मंत्रालय विस्तार,मुंबई.४०० ०३२
दिनांक: १४ मार्च,२०११

संदर्भ :- शासन निर्णय,कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

१) जसुप्र-५४०५/प्र.क्र.१४४/३ अे, दिनांक ७ डिसेंबर,२००५
२) जसुप्र ५४१०/प्र.क्र.२९४/३ अे, दिनांक १० नोव्हेंबर,२०१०
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. जा.कृ.आ/मजसुप्र विप्र ५/ना.प्र.५/१९६/१०-११, दि.२४.१२.२०१०
४) कृषि संचालक (विप्र),कृषि आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र .कृआ/मजसुप्र/विप्र-५/प्र(२०)/भा-२/ २६०/ १०-११,दिनांक ५ मार्च,२०११

प्रस्तावना :

जागतिक बॅक सहाय्यित,महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पाचे माध्यमातून कृषि विभागाचा "कृषि सहाय्यता सेवा घटक" राबविण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्यात विविध सिंचन प्रकल्पाद्धारे उपलब्ध झालेल्या सिंचन साठयाचा कमाल उपयोग होऊन त्याचा लाभ प्रकल्पातंर्गत शेतक-यांना जास्तीत जास्त प्रमाणात करण्याचे दृष्टीने प्रकल्प राबविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. प्रकल्पांतर्गत कृषि व्यावसायिकतेवर आधारित उपक्रमांच्या अंमलबजावणीकरीता कृषी आयुक्तालयामार्फत निर्गमित केलेल्या आवश्यक मार्गदर्शक सूचनांस शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

शासन निर्णय

कृषि व्यावसायिकतेवर आधारित उपक्रमाचे अंमलबजावणी करण्याकरीता जिल्हा व राज्यस्तरावरील गठित करण्यात आलेल्या समितीस संदर्भाधिन दिनांक १० नोव्हेंबर,२०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. कृषि व्यावसायिकतेवर आधारीत प्रकल्पाचे प्रस्ताव तयार करण्यासाठी मार्गदर्शक सुचना कृषि आयुक्तालयाने निर्गमित केल्या आहेत. त्यांच्या मान्यतेच्या अधिन राहून प्रस्तावास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. दिनांक ७ डिसेंबर,२००५ च्या शासन निर्णयात दिलेल्या तपशीलानुसार कृषि विभागामार्फत ९ मोठे पाटबंधारे प्रकल्प, १३ मध्यम पाटबंधारे प्रकल्प आणि ४४ लघुसिंचन प्रकल्प अशा एकूण ६६ पाटबंधारे प्रकल्पांच्या लाभक्षेत्रात कृषि सहाय्यता सेवा या घटकांची अंमलबजावणी कृषि विभागामार्फत करण्यात येत आहे.

३. जागतिक बॅक सहाय्यित - महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्पांतर्गत कृषि सहाय्यता सेवा या घटकातील कृषि व्यावसायिकतेवर आधारित उपक्रमाचे प्रस्तावास एकूण १३.०५ लक्ष (रु.तेरा कोटी पाच लक्ष मात्र) निधीस प्रकल्प अंमलबजावणी आराखडयानुसार (PIP) अंमलबजावणीसाठी शासनाची प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रकल्पाअंतर्गत या कार्यक्रमासाठी ठरविलेले अंतिम उद्घिष्ट प्रकल्पनिहाय दर्शविलेली असून प्रकल्पअंतर्गत बदल करावयाचे असल्यास प्रकल्पाचे नोडल अधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

पाटबंधारे प्रकल्पनिहाय विगतवारी खाली दर्शविल्याप्रमाणे राहील.

अ) भौतिक व आर्थिक लक्षांक (रुपये लाखात)

| अ क्र | पाट बंधारे प्रकल्प | काढणी पश्चात व्यवस्था पन प्रकल्प | कृषि पणन | कृषि प्रक्रिया | कृषि माहिती (सल्ला सेवा) | फलोत्पादन | औषधी सुगंधी वनस्पती व प्रक्रिया | निविष्ठा उत्पादन व विक्री | एकूण भौतिक लक्षांक व |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|

| | | | | | | | | | | | | | | | | प्रकल्पांच ी संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक | आर्थिक | भौतिक |
| १ | मोठे | १० | १०० | १६ | १६० | १० | १०० | ४ | २० | २ | २० | ४ | २० | १० | १०० | ५७ |
| २ | मध्यम | ८ | ८० | १० | १०० | ८ | ८० | ६ | ३० | २ | २० | ४ | २० | ८ | ८० | ४६ |
| ३ | लघु | १० | १०० | ९ | ९० | ४ | ४० | ८ | ४० | ३ | ३० | ५ | २५ | ५ | ५० | ४४ |
| | एकूण | २८ | २८० | ३५ | ३५० | २२ | २२० | १८ | ९० | ७ | ७० | १३ | ६५ | २३ | २३० | १४६ |

ब) जलसंपदा विभागाने मंजुरी दिलेल्या प्रशासकीय व वित्तीय मान्यतेनुसार सहाय्यक अनुदान या उद्दिष्टाकरीता रु.१३.०५ लक्ष (रु.तेरा कोटी पाच लक्ष मात्र) निधी जलसंपदा विभागाच्या खाली दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ मध्ये खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक आय-३
२७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प (योजनांतर्गत)
(८०) सर्वसाधारण
(८००) इतर खर्च (११) महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प
(११)(०१) जागतिक बॅक सहाय्यित,महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प
(२७०१ - बी - ०७३)

५. वरील एकूण रु.१३.०५लक्ष (रु. तेरा कोटी पाच लक्ष मात्र) एवढया मंजूर निधीचा विनियोग करण्यासाठी तसेच संबंधित यंत्रणांना आवश्यकतेनुसार निधी वितरीत करण्यासाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण)तथा प्रकल्पाचे नोडल अधिकारी महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प कृषि सहाय्यता सेवा,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

६. संचालक,(विस्तार व प्रशिक्षण) तथा नोडल अधिकारी,महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प कृषि सहाय्यता सेवा,कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी कृषि सहाय्यता सेवा घटकाच्या अंमलबजावणीचा तपशिल आणि निधी वापर खर्च यासाठी सर्व संबंधित यंत्रणाना तपशीलवार मार्गदर्शक सूचना देण्यात याव्यात.

अ) वितरीत करण्यात येत असलेला निधी हा जागतिक बॅके मार्फत मान्य असलेल्या बाबीवर व बॅकेने प्रस्तावित केलेल्या पध्दतीने खर्च करणे बंधनकारक असल्याने इतर बाबीवर सदर निधी खर्च करु नये.

ब) कोणत्याही नियंत्रक अधिका-यांने त्यांना वितरीत करण्यात येत असलेल्या उद्दिष्टनिहाय निधीमध्ये त्यांचे स्तरावर अंतर्गत फेरबदल करु नये.

क) नियंत्रक अधिका-यांनी या सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

७. हा शासन निर्णय मा. प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदरचा निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०११०३१५१६५२२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(आ. भ. रामटेके )
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

कुलगुरु, सर्व कृषि विद्यापीठे,
सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ जादा प्रतीसह)
सर्व जिल्हाधिकारी
सर्व विधानमंडळ सदस्य / १० प्रति विधानमंडळ ग्रंथालय
सर्व जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधिक्षक अभियंता, प्रकल्प तयारी व व्यवस्थापन कक्ष, मजसुप्र, जलसंपदा विभाग,
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), तथा नोडल अधिकारी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (पाच जादा प्रतीसह)
संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर
सर्व संचालक/ कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व जिल्ह्यांचे जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व प्राचार्य, विभागीय कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, पुणे, नाशिक, कोल्हापूर, औरंगाबाद, अमरावती, खोपोली (जि.रायगड), नागपूर
माहिती व जनसंपर्क संचालनालय, (५ प्रतिंसह)
महालेखाकार, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई
महालेखाकार, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), नागपूर
सर्व सहसचिव /उपसचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग,
निवडनस्ती